# महाराष्ट्र शासन

क्र:- वैखप्र-२०२४/प्र.क्र.५३/रो.आ-०१

सार्वजनिक बांधकाम विभाग,
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २६ मे, २०२५.

**विषय :- वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीबाबत .**
**श्री. भास्कर आत्माराम हुद्दार, नाईक**

**संदर्भ :-** १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण, मुंबई , यांचे पत्र क्र.मुअ(को)/ परिमंडळ शाखा /३९१७, दिनांक २६/०९/२०२४.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण, मुंबई , यांचे पत्र क्र.मुअ(को)/ परिमंडळ शाखा /५०२८, दिनांक ३०/१२/२०२४.

**ज्ञापन -**

श्री. भास्कर आत्माराम हुद्दार, नाईक हे अधीक्षक अभियंता ,रायगड सार्वजनिक बांधकाम मंडळ येथे कार्यरत असून त्यांनी स्वत:च्या वैद्यकिय खर्चाची प्रतिपूर्ती मिळण्याबाबतचा प्रस्ताव सादर केलेला आहे. श्री. भास्कर हुद्दार, नाईक यांना LEFT THALAMIC BLEED WITH RIGHT SIDED HEMIPARESIS या आजारामुळे त्यांना दिनांक ०२/०१/२०२४ ते २९/०१/२०२४ या कालावधीत सूरज हॉस्पीटल, सानपाडा, नवी मुंबई या खाजगी रुग्णालयात अतिदक्षता विभागात तात्काळ उपचारासाठी दाखल करण्यात आले होते. आंतररुग्ण म्हणून घेतलेल्या उपचाराचे वैद्यकिय देयक मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण, मुंबई यांनी शासनाकडे पाठविले आहे. श्री.भास्कर आत्माराम हुद्दार यांचे आजारप्रकरणी झालेल्या उपचारासाठी एकूण रु.९,३९,०६३ एवढा खर्च झालेला असून सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांक- वैखप्र-२०२२/ प्र.क्र.१२०/ राकावी-२, दिनांक १७/०१/२०२३ नुसार रु.५,००,०००/-(अक्षरी रुपये पाच लक्ष ) वरील असल्यामुळे सदर देयक शासन मान्यतेसाठी सादर केले आहे.

२. श्री.भास्कर आत्माराम हुद्दार, नाईक यांचा आजार सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.एमएजी/२००५/९/प्र.क्र./आ.३/ दिनांक १९/०३/२००५ मधील आजार क्रमांक cat-I (1) या वर्गवारीत मोडत असल्याचे जिल्हा शल्य चिकित्सक, ठाणे यांनी त्यांचे पत्र क्र.जिशचि/जिरुठा /वैखदेयक/ प्रतिपूर्ती/मंजूरी/२३६१२/२०,दिनांक २९/०८/२०२४ अन्वये प्रमाणित केले आहे.

३. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.एमएजी/२००५/९/प्र.क्र./आ.३/ दिनांक १९/०३/२००५ व सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.वैखप्र-२०२२/ प्र.क्र.१२०/ राकावि-२, दिनांक १७/०१/२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार ना देय बाबी वगळून तसेच सार्वजनिक आरोग्य सेवा आयुक्तालय यांचे पत्र क्र.संआसे/कक्ष-८ब/टे-१ /वैखप्र/ वाजवी समिती/२७९-३३२ /२०२३,दिनांक १३/०२/२०२३ च्या अनुषंगाने वाजवी खर्चाबाबत दिलेल्या मार्गदर्शक सूचनेनुसार श्री.भास्कर आत्माराम हुद्दार, नाईक यांच्या उपचाराकरिता दि.०२/०१/२०२४ ते २९/०१/२०२४ या आंतररुग्ण कालावधीत खर्च केलेल्या रकमेची परिगणना पुढीलप्रमाणे आहे:-

| अ. क्र. | तपशील | नमुना ड नुसार सादर केलेली रक्कम | सार्वजनिक आरोग्य सेवा आयुक्तालय यांचे दिनांक १३/०२/२०२३ रोजीच्या पत्रानुसार यांनी सूचित केलेली वाजवी खर्चाची अनुज्ञेय रक्कम | एकूण देय रक्कम रुपये |
|---|---|---|---|---|
| भाग (अ)- औषधोपचारावरील खर्च | | | वाजवी खर्च | |
| १ | **Consultations Visits**<br>Dr. Siddhi Kambli<br>Dr.Sweta Kamble<br>Dr.Sayli Chavan<br>Dr. Anjali Patil<br>Dr. A.N.Patil<br><br>Surgeon Dr. Visit<br>Neurologist Dr.Rama Patil | 800 x 16 = 12,800<br>800 x 6 = 4,800<br>800 x 11 = 8,800<br>800 x 3 = 2,400<br>800 x 46 = 36,800<br>800 x 50 = 40,000<br>1500 x 15 = 22,500 | **3,000.00**<br>**(500 x 147 Visits)** | **73,500** |
| | **एकूण (भाग अ)** | रु.1,28,100 | | **रु.73,500** |
| **भाग (ब) - औषधोपचारावरील खर्च** | | | | |
| १ | PATHOLOGY CHARGES | @75,700 /- × 1 = 75.700 | | 75700.00 |
| २ | ABG | @1500/- ×19 = 28,500.00 | | 28,500.00 |
| ३ | X-Ray Charges | @ 800/- × 19 = 15,200.00 | | 15,200.00 |
| ४ | C.T. Scan | @3800/- × 1= 3800.00 | | 3800.00 |
| ५ | CVP Line | @ 3600/- × 2= 7200.00 | | 7200.00 |
| ६ | ECG | @ 400/- × 1= 400.00 | | 400.00 |
| ७ | HGT | @ 75 /- × 106= 7950.00 | | 7950.00 |
| ८ | AIR BED | @ 200 /- × 9= 1800.00 | | 1800.00 |
| ९ | CATHETER | @ 3800/- × 1= 3800.00 | | 3800.00 |
| १० | CRANIAL STIMULATION | @ 750/- × 11= 8250.00 | | 8250.00 |
| ११ | PULSE OXY METER | @ 500/- × 26 = 13,000 | | 13,000.00 |
| १२ | RYLES TUBE INSERTION | @ 500 /- × 5= 2,500 | | 2500.00 |
| १३ | VENTILATOR | @ 5000/- × 5= 25,000 | | 25,000.00 |
| १४ | INTIBUTION | @ 3000/- × 3= 9,000 | | 9,000.00 |
| १५ | MONITOR | @ 750/- × 26 = 19,500 | | 19,500.00 |
| १६ | NOSAL TUBE | @ 500/- × 1= 500 | | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १७ | NEBULIZATION | @ 75/- × 53= 3975 | | 500.00<br>3975.00<br>76,000.00<br>7000.00<br>81034.00<br>354063.00<br>150.00 |
| १८ | OXYGEN | @ 4000/- × 19= 76,000 | | |
| १९ | 2D ECHO | @ 3500/- × 2= 7000 | | |
| २० | NURSING CHARGES | @ 81034/- × 1 = 81034 | | |
| २१ | MEDICINE | @ 354063 | | |
| २२. | REGISTRATION Fee | @ 150 | | |
| | TOTAL | **रु. 7,44,322 /-** | | **7,44,322 .00** |
| १) | **एकूण (भाग ब ) रु.7,44,322 मधून ( नादेय रक्कम रु. 42,432 /- +** CONCESSION IN BILL रु. 40,059 + REGISTRATION Fee रु 150)<br>**वजा केल्यानंतर येणारी रक्कम = रु.6,61,681/-** | | | **रु. 6,61,681/-** |
| २) | **औषधोपचारावरील प्रत्यक्ष खर्चाच्या (रु.6,61,681/- ) 90 टक्के नुसार येणारी रक्कम = रु.5,95,512.9 /--** | | | **रु.5,95,512.9 /-** |
| | **भाग (ब) औषधोपचारावरील खर्चाची येणारी एकूण रक्कम (पूर्णांकात)** | | | **रु.5,95,513 /-** |
| ***भाग (क)- (वास्तव्याचा खर्च)*** | | | | |
| | | देयकातील रक्कम | वाजवी रक्कम | |
| **1** | ICU BED CHARGES (4450 X 16 Days = 71,200 /- | 71,200/- | **32,000.00<br>(2000 x 16 days)** | **32,000.00** |
| **2** | Special Room with Bathroom (3550X 10Days=35,500) | 35,500 /- | **10,000.00<br>(1000 x 10days )** | **10,000.00** |
| | **भाग (क)** | **1,06,700 / -** | **एकूण भाग (क) रक्कम रु.** | **42,000.00** |
| | **एकूण भाग (अ)**<br>**एकूण भाग (ब)**<br>**एकूण भाग (क)** | **रु.1,28,100**<br>**रु. 7,04,263/-**<br>( रु. 7,44,322 /- वजा Discount रु.40059 /-)<br>**रु. 1,06,700 / –** | **रु. 73,500 /-(वाजवी खर्च )**<br>**रु. 5,95,513 /- (90 %)**<br>**रु.42,000 /- (वाजवी खर्च )** | **73,500.00**<br>**5,95,513.00**<br>**42,000.00** |
| | **एकूण (भाग अ + भाग ब + भाग क)** | **रु. 9,39,063 /-** | **रु. 7,11,013 /-** | **रु. 7,11,013.00** |
| | एकूण प्रतिपुर्तीची रक्कम – रुपये सात लाख अकरा हजार आणि तेरा फक्त | | | |

४. सार्वजनिक आरोग्य विभागाच्या सचिव समितीच्या दिनांक ०८/०४/२०२५ रोजी झालेल्या बैठकीत श्री. भास्कर आत्माराम हुद्दार, नाईक यांच्या आजारावरील वैद्यकीय खर्च प्रतिपूर्तीच्या प्रकरणात, रक्कम रु. ७,११,०१३ /- (रुपये सात लाख अकरा हजार आणि तेरा फक्त ) इतक्या रक्कमेच्या उपरोक्त तक्त्यात नमूद केलेल्या वैद्यकीय खर्च प्रतिपूर्तीस सचिव समितीने एक विशेष बाब म्हणून खालील अटींच्या अधीन राहून मान्यता दिली आहे :-

(१) शासकीय कर्मचाऱ्याने/कायदेशीर वारसाने प्रस्तुत प्रकरणातील वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती मिळण्याकरीता कोणत्याही विमा कंपनीकडे दावा केलेला नाही वा देयकाची रक्कम अन्य धर्मदाय संस्था/ट्रस्ट कडुन आहंरित केलेली नाही, याबाबतचे तसेच संबंधित रुग्ण कर्मचाऱ्यावर पूर्णपणे अवलंबुन असल्याबाबतचे शपथपत्र (affidavit) देयकासोबत अदायगीच्यावेळी जोडणे बंधनकारक राहील, याबाबतचा स्पष्ट उल्लेख मंजूरी आदेशात नमूद करुनच आदेश निर्गमित करावेत.

(२) संबंधित प्रशासकीय विभागाने सचिव समितीच्या उपरोक्त निर्णयानुसार वैद्यकीय देयकाचा परिगणीत केलेल्या रक्कमेचा तक्ता स्पष्टपणे मंजूरी आदेशात दर्शवुन, मंजूरी आदेश निर्गमित करावेत व त्याची प्रत या विभागास चिन्हांकित करावी.

(३) या प्रकरणी अतिप्रदान झाल्याची/दुबार देयक प्रदान झाल्याची बाब निदर्शनास आल्यास, वैद्यकीय खर्च प्रतिपूर्तीची मंजूर केलेली संपुर्ण रक्कम संबंधित शासकीय कर्मचारी/संबंधितांकडून वसूल करण्याचे आदेश शासन देईल.

(४) महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम १९६१ मधील नियम क्र.८ (५) नुसार प्राधिकृत वैद्यकीय देखभाल अधिकाऱ्यास वाजवी वाटेल एवढ्याच रकमेची शासन प्रतिपुर्ती करील, अशी तरतुद असून, या तरतूदीनुसारच वैद्यकीय खर्चाचा वाजवीपणा तपासून प्रस्तुत प्रकरणी सचिव समितीने घेतलेला निर्णय, वरील नियमातील नियम क्र.१२ नुसार अंतिम असल्याने, सदर प्रकरण पुन्हा सचिव समितीच्या पुनर्विचारार्थ सादर होणार नाही, याची संबंधित विभागाने दक्षता घ्यावी.

५. उपरोक्त मान्यतेस अनुसरुन श्री. भास्कर आत्माराम हुद्दार, नाईक यांच्या आजारावरील दिनांक ०२/०१/२०२४ ते २९/०१/२०२४ या कालावधीत उपचारासाठी आलेला रु.९,३९,०६३ /- या रकमेपैकी कोष्टकात नमुद केल्यानुसार रु. ७,११,०१३ /- इतकी वैद्यकीय खर्च प्रतिपूर्तीची रक्कम मंजूर करण्यास या ज्ञापनान्वये शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

६. उपरोक्त प्रमाणे मंजूर करण्यात आलेली वैद्यकिय खर्चाची प्रतीपुर्तीची रक्कम परिच्छेद क्र.४ मधील नमुद ४ अटींच्या आणि तसेच पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहील:-

अ) मंजूर करण्यात आलेल्या प्रतिपूर्तीची रक्कम ही सर्व नियम, आदेशातील इतर सर्व तरतूदीच्या अधिन राहील.

ब) वरील प्रमाणे प्रतिपूर्तीची परिगणना करण्यात आली असली तरी महाराष्ट्र राज्यसेवा (वैद्यकीय देखभाल) नियम,१९६१ मधील नियम क्र.३ (आठ), ११(१) व (२) मधील तरतूदी नुसार अंतिम रक्कम अदा करण्यापूर्वी पुन्हा एकदा देयकातील अनुज्ञेय नसलेल्या बाबींची फेरतपासणी करुन अनुज्ञेय नसलेला खर्च वगळण्याची दक्षता मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांचे कार्यालय, कोकण, मुंबई यांनी घ्यावी.

क) सदरचा खर्च मंजूर तरतूदीतूनच भागविण्यात यावा.

**७.** सदर शासन ज्ञापन हे, सार्वजनिक आरोग्य विभागाच्या दिनांक ०८/०४/२०२५ रोजीच्या बैठकीत सचिव समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन विशेष बाब म्हणून क्र.वैखप्र-२०२२ /प्र.क्र.१२०/ रा.का.वि.२, दिनांक १७/०१/२०२३ व सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र- वैखप्र -२०२३/ प्र.क्र.१४६/सेवा-४, दिनांक २२/०८/२०२३ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०२५०५२६१३०९३९६६१८ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANANDA SHIVAJI NIMBALKAR

Digitally signed by ANANDA SHIVAJI NIMBALKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=bd8b8d40b9fcd5b18aaaef1d1760b7112f7fbabce1279c5ea681b9a1193cb544, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=03860AF74163AFB28DF97DAA3229C54F81BFC64ECEC50CAABAD97C7C8AEDB890, cn=ANANDA SHIVAJI NIMBALKAR
Date: 2025.05.26 13:10:52 +05'30'

**(आ.शि. निंबाळकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत: मूळ वैद्यकीय देयक**

**प्रति :-** मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांचे कार्यालय, कोकण, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई

**प्रत :**
१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर .
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखापरीक्षा) मुंबई /नागपूर .
३) अवर सचिव (रा.का.वि.-२) सार्वजनिक आरोग्य विभाग, जी.टी.रुग्णालय प्रशासकिय इमारत,मुंबई.
४) अधीक्षक अभियंता, रायगड सा.बां.मंडळ, कोकण भवन,नवी मुंबई.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड (अलिबाग)/ठाणे
६) श्री. भास्कर आत्माराम हुद्दार, नाईक , अधीक्षक अभियंता, रायगड सा.बां.मंडळ यांचे कार्यालय,कोकण भवन,नवी मुंबई (कार्यालयामार्फत)
७) रोजंदारी आस्थापना-१ कार्यासन संग्रहार्थ